**मौजा दुर्गापूर, ता. जि. चंद्रपूर येथील स.नं. १६८ व १६९ मधील ८.९९ हे. आर अतिक्रमित जमीन मानीव गावठाण विस्तारासाठी संपादित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफएलडी-२०१८/प्र.क्र.०४/र-१२**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १२ जून, २०१८

**संदर्भ**:- १. भारत सरकार, उर्जा मंत्रालय, कोळसा विभाग यांचे क्र.१५/६/८०-सीएल/ एलएसडब्ल्यू, नवी दिल्ली, दि. २५.०१.१९९१

२. मा. मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल याचिका क्र. ६८२८/२०१४ मध्ये दिनांक ८.१.२०१६ रोजी दिलेले आदेश

३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१६/३१७, दि.०२.०६.१६ चे पत्र.

४. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१६/४२४, दि.२१.१०.१६ चे पत्र.

५. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१६/४३०, दि.११.११.१६ चे पत्र.

६. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१६/४४३, दि.१३.१२.१६ चे पत्र.

७. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१७/८१, दि.१६.०३.१७ चे पत्र.

८. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१७/९५, दि.०५.०४.१७ चे पत्र.

९. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१७/१६४, दि.२४.११.१७ चे पत्र.

१०. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे क्र.मशा/कार्या-४/आर बी-३/२०१८/२, दि.४.१.२०१८ चे पत्र

**प्रस्तावना** :-

मौजा दुर्गापूर, ता.जि. चंद्रपूर येथील श्री. संतोष बेंडले व इतर यांच्या मालकीची स.नं. १६८ व १६९ मधील ८.९९ हे. आर जमीन वेस्टर्न कोलफील्ड लि. करिता, भारत सरकार, उर्जा मंत्रालय, कोळसा विभाग यांच्या दि.४ ऑगष्ट १९७९ च्या अधिसूचनेनुसार संपादित करण्यात आली होती. वेस्टर्न कोलफील्ड लि., कडून मूळ जमीन मालक श्री. बेंडले व इतर यांना उक्त जमिनीचा मोबदला अदा करण्यात आलेला नाही. भारत सरकारने दिनांक २५ जानेवारी १९९१ च्या पत्रान्वये स.नं. १६८ व १६९ क्षेत्र ८.९९ हे.आर. जमीन ग्रँटडिडचे करारानुसार मूळ मालक श्री.संतोष बेंडले व इतर यांना परत करण्याबाबत कळविले होते. तेव्हा सदर जमिनीवर अतिक्रमण होते. अतिक्रमण विरहित जमिनीचा ताबा प्राप्त होत नसल्याने श्री.संतोष बेंडले व इतर यांनी दाखल केलेल्या दिवाणी दाव्यामध्ये दि.१७/११/२००४ रोजी आदेश पारित झाले असून त्यात भारत सरकारच्या कोळसा मंत्रालयाने, जिल्हाधिकारी, चंद्रपूर व ग्रामपंचायत, दुर्गापूर यांचे सहाय्याने सदर जमिनीवरील अतिक्रमण मोकळे करुन जागेचा ताबा मूळ मालकाला देण्याचे मा. न्यायालयाने आदेशित केले. उपरोक्त आदेशाचे पालन होत नसल्याबाबत मूळ मालकांनी मा.मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल केलेल्या याचिका क्र. ६८२८/२०१४ मध्ये दिनांक ८/१/२०१६ रोजी, भारत सरकारच्या कोळसा मंत्रालयाने, जिल्हाधिकारी, चंद्रपूर

व ग्रामपंचायत दुर्गापूर यांचे सहाय्याने अतिक्रमण मोकळे करुन जागेचा ताबा मूळ मालकास देण्याची कार्यवाही करण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने आदेशित केले होते. उक्त जमिनीवरील अतिक्रमित घरे व लोकसंख्या लक्षात घेता, मोठया प्रमाणावर असलेले अतिक्रमण काढणे कायदा व सुव्यवस्था तसेच सामाजिक परिस्थितीस अनुसरुन योग्य होणार नसल्याचे जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी निदर्शनास आणले आहे.

सदर प्रकरणाची विवक्षित पार्श्वभूमी विचारात घेऊन मौजा दुर्गापूर, ता. जि. चंद्रपूर येथील स.नं. १६८ व १६९ मधील ८.९९ हे. आर अतिक्रमित जमीन मानीव गावठाण विस्तारासाठी संपादित करण्याबाबत व त्यापोटी सदर जमिनीच्या मूळ मालकांना "भूमी संपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" अन्वये चालू वर्षाच्या मूल्यांकनानुसार येणारी रक्कम मोबदला म्हणून अदा करण्याबाबतच्या संदर्भात दिनांक १४ डिसेंबर, २०१७ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचारविनिमय होऊन झालेला निर्णय जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांना शपथपत्राद्वारे सादर केला आहे. सदर वस्तुस्थितीच्या अनुषंगाने उक्त जमीन मानीव गावठाण विस्तारासाठी संपादन करण्याची प्रक्रिया सुरू करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्णय निर्गमित करीत आहे:-

**<u>शासन निर्णय</u>:-**

मौजा दुर्गापूर, ता. जि. चंद्रपूर येथील स.नं. १६८ व १६९ मधील ८.९९ हे. आर जमीन मानीव गावठाण विस्तार म्हणून "भूमी संपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" नुसार संपादित करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) मानीव भूसंपादनाची कार्यवाही जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेकडून करण्यात यावी.
२) सदर जमिनीवर नगर रचनाकार, चंद्रपूर यांच्याकडून अभिन्यास तयार करून घेण्यात यावा.
३) उक्त जमिनीच्या मूळ मालकांस भूसंपादनाअंती प्रदान केलेली मोबदला रक्कम विचारात घेऊन, एकूण संपादित क्षेत्राच्या आधारे प्रती चौरस मीटर मोबदल्याची रक्कम परिगणित करून त्याआधारे प्रत्येक अतिक्रमणधारकांच्या प्लॉटच्या क्षेत्रफळानुसार त्यांच्याकडून वसूल करावयाच्या रकमेची परिगणना करण्यात यावी.
४) अतिक्रमणधारकांकडून त्यांच्या प्लॉटच्या क्षेत्रफळानुसार परिगणित होणारी रक्कम वसूल करून, त्यांना प्लॉटचे वितरण जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी करावे.
५) जे प्लॉटधारक सदर रक्कम जमा करू शकणार नाहीत, त्या अतिक्रमणधारकांच्या प्लॉटवर, क्षेत्रफळानुसार परिगणित होणा-या व शासनास देय रकमेचा बोजा संबंधित प्लॉटवर चढविण्यात यावा आणि कालबध्दपध्दतीने त्या रकमेची नियमानुसार वसूली जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी करावी.
६) बोजा चढविलेल्या दिवसापासून संबंधितांना नोटिस देऊन प्रचलित PLR दरानुसार निर्धारित रकमेवर व्याजाची आकारणी करण्यात यावी.

२. सदर तसेच मानीव गावठाण विस्तार म्हणून उक्त जमीन संपादित करण्याबाबत चालू वर्षाच्या मूल्यांकनानुसार आवश्यक असलेल्या रकमेचा अहवाल जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांच्याकडून प्राप्त झाल्यानंतर सदर

रकमेची तरतूद "गावठाण विस्तार" या प्रयोजनार्थ महसूल व वन विभागाच्या नियंत्रणाखालील लेखाशीर्षांतर्गत करण्यात येईल. सदर रक्कम उक्त जमिनीच्या मूळ मालकांना भूसंपादनाअंती जिल्हाधिकाऱ्यांमार्फत अदा करण्यात येईल.

३. सदर प्रकरणी घेतलेला मंत्रिमंडळ निर्णय विवक्षित स्वरूपाचा असून तो अन्य कोणत्याही प्रकरणासाठी पूर्वोदाहरण म्हणून लागू होणार नाही.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९१/२०१७/व्यय-९, दि.८.१२.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१८०६१२१६५३३०५११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.06.12 16:55:19 +05'30'

**( दयानंद मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (महसूल, मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
७) अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) मंत्रालय, मुंबई -३२.
८) अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.
९) प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.
१०) प्रधान सचिव, (नगर विकास विभाग-१), मंत्रालय,मुंबई -३२.
११) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
१२) जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
१३) मा. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) मा. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१५) नगर विकास विभाग (नवि-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.

१६) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.

१७) विधी व न्याय विभाग (ई ब्रँच), मंत्रालय, मुंबई.

१८) निवडनस्ती, कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.